आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत पंडित दीनदयाल उपाध्याय स्वयंम योजनेसाठी निधी वितरण.
(लेखाशीर्ष २२२५ ई०२४)

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१/प्र.क्र.०२/ कार्यासन ६**
**मंत्रालय (विस्तार), मुंबई-४०० ०३२**
**दिनांक : -०१ नोव्हेंबर, २०२१.**

**वाचा :-**

१) शासन निर्णय, वि. वि. क्र. अर्थसं-२०२१ /प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२) शासन निर्णय, आदिवासी विकास विभाग, समक्रमांक, दि.१६.०७.२०२१.
३) आदिवासी विकास विभागाचे नस्ती क्र.आवगृ-२०२१/प्र.क्र.५०/का-१२.
४) आदिवासी विकास विभागाचे पत्र क्र.आवगृ-२०२१/प्र.क्र.५०/का-१२.दि.०१.११.२०२१

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत पंडित दीनदयाल उपाध्याय स्वयम् योजनेंतर्गत आदिवासी विद्यार्थ्यांचे सन २०२०-२१ या शैक्षणिक वर्षामधील प्रलंबित अनुदान अदा करण्यासाठी सन २०२१-२२ मधील उपलब्ध आर्थिक तरतुदींतून निधी वितरीत करण्याबाबत संदर्भाधीन क्र.३ अन्वये सादर करण्यात आलेल्या प्रस्तावास अनुसरुन वित्त विभागाने निधी वितरीत करण्यास मान्यता दिली आहे. , सदर मर्यादेत निधी वितरीत करण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत अनुसूचित जमाती घटकासाठी मागणी क्र.टी-५ याखाली मुख्य लेखाशीर्ष २२२५, अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या खाली सन २०२०-२१ या शैक्षणिक वर्षातील प्रलंबित अनुदान अदा करण्यासाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षाच्या अर्थसंकल्पीय तरतुदींमधून खालीलप्रमाणे स्तंभ ६ मध्ये नमूद निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु.लाखात)

| योजनेचे नाव | लेखाशिर्ष | बाब | सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पित तरतूद | यापुर्वी वितरीत तरतूद | सदर शा.नि. अन्वये वितरीत करण्यात येत असलेला निधी |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| पंडित दीनदयाल उपाध्याय स्वयंम योजना | २२२५ ई ०२४ | ३१, सहायक अनुदाने (वेतनेतर) | ७०००.०० | १०५०.०० | १२००.०० |

२. उपरोक्त प्रमाणे **रु.१२००.०० लाख (अक्षरी रुपये बारा कोटी फक्त)** इतका निधी नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, आदिवासी विकास यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत करण्यात येत आहे. संदर्भाधिन क्र.४ येथील पत्राने कळविल्यानुसार शैक्षणिक वर्ष सन २०२०-२१ मधील जेवढ्या कालावधीकरीता शासकीय वसतीगृहे सुरु होती, तेवढ्याच कालावधीकरीता पंडीत दीनदयाल उपाध्याय स्वयम् योजनेंतर्गत लाभ देण्याकरीता सदर निधीचा विनियोग करण्यात यावा.

३. प्रकरणी नियंत्रक अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तिय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे.

४. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतुदींतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशीर्षनिहाय/ उपलेखाशीर्षनिहाय शिष्यवृत्ती अदा करण्यात आलेल्या विद्यार्थ्यांचा तपशील, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास पाठवावी व निधी उपयोगिता प्रमाणपत्रासह पुढील निधी वितरणासाठी प्रस्ताव सादर करावा.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.९०९/व्यय-१४, दि.८.१०.२०२१ अन्वये दिलेल्या सहमतीस अनुसरून निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२११०२८११२१२९९७२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vijesing Fattesing Vasave

Digitally signed by Vijesing Fattesing Vasave
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Planning Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5494d2ad3a3bc5ddd66daf9a8f17ceec5e2d7d4b6a8bba99c51d275801bcdf1b, serialNumber=2182f4f20daa6841ab430b2fd812e7b5d3a883e72efa574ca5e29ff528bc8015, cn=Vijesing Fattesing Vasave
Date: 2021.11.01 17:40:34 +05'30'

(वि.फ.वसावे)
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
४. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग
५. ग्रंथपाल, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, ५ वा माळा, विधानभवन, मुंबई.
६. महालेखापाल (लेखापरिक्षा) / (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
७. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
८. सर्व प्रकल्प अधिकारी,एकात्मीक आदिवासी विकास प्रकल्प
९. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१०. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
११. निवड नस्ती (का-६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.